**महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ अंतर्गत प्रोत्साहनपर लाभ योजना (राज्यस्तर)(कार्यक्रम) योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं- ०१२३/प्र.क्र. १६/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२३

**संदर्भ** :-
१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. प्रोअयो ०६२२/प्र. क्र. ७२/२-स, दिनांक २९.०७.२०२२.
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचे पत्र क्र. कृषीपत-११/मजोफुशेकयो-प्रोअयो/ मागणी/१३१८/२०२२, दिनांक ०१.०८.२०२२.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं- ०७२२/प्र.क्र. ९०/२-स, दिनांक १६.०९.२०२२, दिनांक १८.१०.२०२२, दिनांक १७.०१.२०२३ व दिनांक ०७.०२.२०२३ .
४) वित्त विभाग परिपत्रक क्र. पुरक-२०२२/प्र.क्र. ४३/अर्थसंकल्प-३, दिनांक १६.०३.२०२३.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचे पत्र क्र. कृषीपत-११/मजोफुशेकयो-प्रोत्सा./ २०२३, दिनांक २०.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

सन २०२२ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात अल्पमुदतीच्या पीककर्जाची नियमितपणे परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना रु. ५० हजारापर्यंत प्रोत्साहनपर लाभ देण्यासाठी सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात अर्थसंकल्पीय तरतूद करण्याची घोषणा करण्यात आली होती. त्यानुसार अल्पमुदत पीक कर्जाची पुर्णतः परतफेड केलेल्या शेतकऱ्यांना पीक कर्जाच्या रक्कमेवर जास्तीत जास्त रु. ५० हजार पर्यंत प्रोत्साहनपर लाभ देणेबाबत संदर्भ क्र. १, दिनांक २९.०७.२०२२ अन्वये महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ अंतर्गत प्रोत्साहनपर लाभ योजनेचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. तसेच सदर योजनेसाठी सन २०२२-२३ च्या वित्तीय वर्षात पुरवणी मागणीद्वारे रु. ४७००.०० कोटीची तरतूद करण्यात आली असून सुधारीत अर्थसंकल्पान्वये एकूण रु. ५७१४.०० कोटीची तरतूद करण्यात आली आहे.

२. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ अंतर्गत प्रोत्साहनपर लाभ योजना (राज्यस्तर) (कार्यक्रम) (२४३५ ०१८९), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाअंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु. ४७००.०० कोटी इतकी तरतुद संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली आहे. सद्यस्थितीत सहकार आयुक्त व निबंधक यांच्या संदर्भ क्र.५ दिनांक २०.०३.२०२३ च्या पत्रान्वये सदर योजनेसाठी उर्वरीत रु. ७४०.६५ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाकडील कार्यक्रम खर्चाच्या योजनेअंतर्गत मंजूर निधीपैकी रु. ७४०.६५ कोटी (रु. सातशे चाळीस कोटी पासष्ट लाख फक्त) इतकी रक्कम महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ अंतर्गत प्रोत्साहनपर लाभ योजना (राज्यस्तर) (कार्यक्रम) (२४३५ ०१८९), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाअंतर्गत वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मागणी क्रमांक व्ही-०२, २४३५-इतर कृषीविषयक कार्यक्रम ६०-इतर, १०१ शेतकऱ्यांसाठी कर्जमाफी योजना, (००)(०४) महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ अंतर्गत प्रोत्साहनपर लाभ योजना (राज्यस्तर) (कार्यक्रम) (२४३५ ०१८९), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखालील सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाअंतर्गत उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून करण्यात यावा.

३. सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात आले आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल याची सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दक्षता घ्यावी. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक १६५/का.१४३१, दिनांक २४.०३.२०२३ अन्वये तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २७१/व्यय २, दिनांक २८.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३२९१६३१५७८३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e,
pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5,
serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2023.03.29 16:37:21 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**विशेष कार्य अधिकारी तथा सहनिबंधक,**
**सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.
५) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
६) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
७) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
८) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (कार्यासन २-स).